वसंतराव नाईक कला व वाणिज्य महाविद्यालय, म्हसळा, जि. रायगड या महाविद्यालयातील १०० टक्के अनुदानावर आलेल्या विद्याशाखेस अनुज्ञेय होणाऱ्या पदांच्या वेतन खर्चाचा बांधिलकी खर्चाखाली समावेश करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०२२/प्र.क्र.५९/(५)/मशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ एप्रिल,२०२३.

वाचा : शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक-अनुदा-२०११/(२००/११)पुर्नबांधणी-६/मशि-४, दिनांक २६ मे, २०२२.

**प्रस्तावना** :

प्रत्येक तालुक्यात एक महाविद्यालय/विद्याशाखा यांना १०० टक्के अनुदान मंजूर करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यास अनुसरुन संदर्भिय दिनांक २६/०५/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण १८ महाविद्यालयातील संबंधित विद्याशाखांना शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून १०० टक्के अनुदानावर आणण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील प्रपत्र-ब, अनुक्रमांक १. येथे नमूद वसंतराव नाईक कला व वाणिज्य महाविद्यालय, म्हसळा, जि. रायगड या महाविद्यालयातील विज्ञान शाखेकरीता अनुज्ञेय होणाऱ्या शिक्षक व शिक्षकेत्तर पदांच्या वेतन खर्चाचा बांधिलकी खर्चाखाली समावेश करण्यासाठी डिसेंबर, २०२२ चे चतुर्थ (हिवाळी) अधिवेशनात सादर करण्यात आलेली लाक्षणिक पूरक मागणी मंजूर झाली आहे. त्यानुसार सदर पदांच्या वेतन खर्चाचा बांधिलकी खर्चाखाली समावेश करणेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे वसंतराव नाईक कला व वाणिज्य महाविद्यालय, म्हसळा, जि. रायगड या महाविद्यालयातील विज्ञान शाखेकरीता अनुज्ञेय होणाऱ्या पुढील विवरणपत्रात नमूद १५ शिक्षक व ०५ शिक्षकेत्तर अशा एकूण २० पदांवर विहित अर्हता प्राप्त व विधिवत विहीत मार्गाने नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षक/शिक्षकेत्तर पदांच्या वेतन खर्चाचा बांधिलकी खर्चाखाली समाविष्ट करण्यास संदर्भिय शासन निर्णय, दिनांक २६/०५/२०२२ मध्ये नमूद अटी व शर्ती तसेच पुढील अटींच्या अधीन राहून मान्यता देत आहे.

| अ. क्र. | महाविद्यालयाचे नांव | विद्या शाखा/ तुकडी/ विषय | अनुदेय पदे | | पदनाम | अनुज्ञेय पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | शिक्षक | शिक्षकेत्तर | | |
| १ | वसंतराव नाईक कला व वाणिज्य महाविद्यालय, म्हसळा, जि. रायगड | विज्ञान शाखा | १५ | ०५ | सहायक प्राध्यापक | १५ |
| | | | | | प्रयोग शाळा सहायक | ०१ |
| | | | | | प्रयोग शाळा परिचर | ०४ |
| | | | | | एकूण | २० |

**अटी** :-

१. रिक्त पदे भरण्याकरीता शासनाची विहित मार्गाने मान्यता घेण्यात यावी. त्याशिवाय रिक्त पदे भरण्यात येऊ नये.

२. संबंधित विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) यांनी उपरोक्त पदांना देय होणाऱ्या वेतनाची अचुक परिगणना न करता वेतन अदा केल्याचे आढळल्यास त्यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन कार्यवाही करण्यात यावी.

३. सदर पदांपैकी भरण्यात आलेल्या पदावर विहित अर्हता प्राप्त व विधिवत मार्गानेच व आरक्षणानुसार नियुक्ती देण्यात आल्याबाबत तसेच संदर्भिय शासन निर्णय, दिनांक २६/०५/२०२२ मधील अटी व शर्तीच्या पूर्ततेबाबतची तपासणी संचालक, उच्च शिक्षण यांनी केल्यानंतरच वेतन अनुदान देय राहील. सदर वेतन व भत्त्याचा खर्च दिनांक २६ मे, २०२२ पासून अनुज्ञेय राहील. मागील थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

२. या बाबींवर होणारा खर्च "मागणी क्र. डब्ल्यू-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०४ अशासकीय महाविद्यालयांना व संस्थांना सहाय्य (०१) अशासकीय महाविद्यालयांना अनुदाने (०१)(०१) अशासकीय कला, विज्ञान, वाणिज्य व विधी महाविद्यालयांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०८७२) ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१/२०२३/व्यय-५, दिनांक ०९/०१/२०२३ नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०४१११८२८२५२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR

Digitally signed by HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec54206337 22d42e0976d82a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=284A4236AE7795D36DD2ECB5AC6CA70C333A3CF1B 13F66828D224AE2026B37E9, cn=HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
Date: 2023.04.11 18:34:56 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
६. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
७. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोंकण विभाग, पनवेल, जि.रायगड.
८. प्राचार्य, वसंतराव नाईक कला व वाणिज्य महाविद्यालय, म्हसळा, जि. रायगड.
९. कार्यासन साशि-१/मशि-२/मशि-४/मशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.